कोविड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोविड-१९ विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्याच्या कुटुंबियांना सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.- कै. कौसर नियाजी अमिराद्यीन मोहमदी, सेवा अभियंता

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः** संकिर्ण-२०२२/प्र.क्र.१५८/सेवा-५
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : १४ मार्च,२०२२

**संदर्भ :-**

१. वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२०.
२. वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक १४.५.२०२१
३. संचालक, आरोग्य सेवा, पुणे यांचे क्र.संआसे/कोवीड-१९/कक्ष-५८/ कोविड-१९/विमा कवच प्रस्ताव/२६३९५-४०१/२१ दि.२८.१२.२१ चा प्रस्ताव

**शासन निर्णय :-** संदर्भांकित क्रमांक १ येथील वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक २९ मे, २०२० अन्वये कोविड-१९ संबंधित कर्तव्य बजावतांना कोविड-१९ विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू होणाऱ्या कर्मचाऱ्यांना विमा कवच/ सानुग्रह सहाय्य लागू करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे.

२. संचालक, आरोग्य सेवा, पुणे यांनी कै. कौसर नियाजी अमिराद्यीन मोहमदी, सेवा अभियंता यांच्या कुटुंबियांना शासन निर्णय, वित्त विभाग क्र. संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२० अनुसार रु. ५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेच्या सानुग्रह सहाय्य मंजूरीचा प्रस्ताव सादर केला आहे.

३. जिल्हा रुग्णालय, नांदेड येथे कार्यरत असलेले कै. कौसर नियाजी अमिराद्यीन मोहमदी, सेवा अभियंता यांचा कोविड-१९ संबंधित कर्तव्य पार पाडताना कोरोना विषाणू संसर्गाने दि. २०.०३.२०२१ रोजी मृत्यू झाला आहे. त्यांच्या सेवा कोविड-१९ विषाणूच्या सार्वत्रिक साथीच्या अनुषंगाने मदतकार्य यामध्ये समाविष्ट होत आहेत. मृत्यूच्या तारखेपूर्वी १४ दिवसांच्या काळात ते कर्तव्यावर हजर होते. कै.कौसर मोहमदी यांचा मृत्यू कोविड-१९ मुळे झाला असल्याचे जिल्हा शल्यचिकित्सक, नांदेड यांनी प्रमाणित केले आहे.

४. त्यानुसार, जिल्हा रुग्णालय, नांदेड येथे कार्यरत कै. कौसर नियाजी अमिराद्यीन मोहमदी, सेवा अभियंता यांच्या कुटुंबियांना रु. ५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेचे सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास या आदेशाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

५. वित्त विभाग शासन निर्णय, क्र. संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२० मधील तरतूदीनुसार कै. कौसर नियाजी अमिराद्यीन मोहमदी या कर्मचाऱ्याच्या वारसास या संदर्भातील तरतूदी व नियम विचारात घेऊन सानुग्रह सहाय्य अदा करण्याची जबाबदारी संचालक, आरोग्य सेवा, पुणे यांची राहील.

६. प्रस्तुत खर्च खाली नमूद लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यईल.

२२१०- ०६-सार्वजनिक आरोग्य

००१-संचालन व प्रशासन ८००-इतर खर्च

उपशिर्ष ८००(एक) सार्वजनिक आरोग्य परिवहन संघटनेची आस्थापना (२२१०१०५३

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२२०३१११८३४३११८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

ARCHANA VILAS WALZADE

Digitally signed by ARCHANA VILAS WALZADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=b17094004b015083dae757656e5d24847898197ddd6b0366a9177f097ed0887a, pseudonym=EFE0AAA7FB78AD706283B7A34C5FC48C1920AEBD, serialNumber=B4E19876AB3EEC36E3A3B988441648AB87470CDFE66B14CFBE7AC9BD770485C1, cn=ARCHANA VILAS WALZADE
Date: 2022.03.14 12:58:18 +05'30'

(अर्चना वालझाडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१)आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.

२)संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, पुणे.

३)महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर

४)उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर

५)जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, नांदेड

६)जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड/लातूर

७)श्रीमती. तरन्नुम कौसर नियाजी मोहमदी, रा.जैतुन पॅलेस, बंगला नं.०६, सुयोगनगर, जेलरोड, नासिकरोड, ता.नाशिक.

८)निवडनस्ती (सेवा-५)